**प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयातील ४ राजपत्रित अस्थायी पदे दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक :- एफएसटी-०४/१६/प्र.क्र.१३३/फ-४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २४ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :-** १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-३/योजनेतर/प्र.क्र.२६/१७-१८/२१७०, दि.२२.०२.२०१८

२) शासन निर्णय क्र.एफएसटी-०४/१६/प्र.क्र.१३३/फ-४, दि.१५.०३.२०१८

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि -२०१६ /प्र.क्र.८ /१६ /आ.पु.क., दि.०७.०९.२०१८

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-३ /योजनेतर /प्र.क्र.१ /१८-१९ /११०१ /१८-१९, दि.२४.०९.२०१८.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य नागपूर यांच्या कार्यालयातील ४ राजपत्रीत व १ अराजपत्रीत अशा एकूण ५ (पाच) अस्थायी पदांपैकी दफ्तरी हे पद निरसीत करण्यात आले असल्यामुळे सदरचे पद कमी करुन उर्वरीत ४ राजपत्रीत अस्थायी पदांना दि.०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यत संदर्भ क्रमांक-२ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य नागपूर यांच्या कार्यालयातील ४ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.४ अन्वये शासनास सादर केला आहे. आकृतिबंधातील एकूण २५०२५ पदांमध्ये या ४ अस्थायी पदांचा समावेश आहे.

३. उक्त परिस्थितीत प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य नागपूर यांच्या कार्यालयातील ४ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर मंजूरी वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ मधील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे. वित्त विभागाने सदर शासन निर्णयामध्ये दिलेल्या निर्णयानुसार विहित कालावधीत कार्यवाही करावी.

४. सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर या कार्यालयातील पदे**

| | |
|---|---|
| **प्रधान शीर्ष** | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| **उपप्रधान शीर्ष** | ०१ वनीकरण |
| **गौण शीर्ष** | ००१ संचालन व प्रशासन |
| | ०१ संचालन व प्रशासन |
| **उपशीर्ष** | (०१)(०१) मुख्य वनसंरक्षक (२४०६ ००२२ ) |

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि २०१६ /प्र.क्र.८ /१६ /आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ मधील तरतुदीनुसार विभागास असलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२४१७५३१९९८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Babasaheb S. Shinde

Digitally signed by Babasaheb S. Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1706e7b903eb05a5f1c405f3795499452af658b876e10b223a0cef893b6b6689, cn=Babasaheb S. Shinde
Date: 2018.10.24 18:00:12 +05'30'

**(बा. सि. शिंदे)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२ मुंबई/नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) सर्व अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) ब-१ कार्यासन, फ-२ कार्यासन, फ-८कार्यासन, फ-७ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) निवडनस्ती, फ-४ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक:- एफएसटी-०४/१६/प्र.क्र.१३३/फ-४, दि.२४.१०.२०१८**

**विवरणपत्र "अ"**

**प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य नागपूर यांच्या कार्यालयातील २०१८-२०१९ मध्ये दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यत पुढे चालू ठेवण्यात आलेली राजपत्रित अस्थायी पदांची यादी.**

| अ. क्र. | पदांचे नाव | अस्थायी पदांची संख्या | स्तंभ क्रमांक ३ मधील पद/ पदे ज्या शासकीय आदेशान्वये निर्माण केली त्या आदेशाचा क्रमांक आणि दिनांक | स्तंभ क्र. ३ मधील पद/ पदे २०१७-२०१८ यावर्षी ज्या शासकीय आदेशान्वये पुढे चालू ठेवली होती त्याचा क्रमांक आणि दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | प्रधान मुख्य वनसंरक्षक (हेड ऑफ फॉरेस्ट फोर्स) | १ | शा.नि.म.व.व.वि.क्र.एफडीएम १९८०/१/फ-२ दि.२५.१.१९८२ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३३/फ-४, दि.१५.०३.२०१८ |
| २ | प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन ) | १ | केंद्र शासनाकडील अधिसूचना क्र-१६०१६/२००२/AIS(II)/A, दि.१७.४.२००२ अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन) या पदाची श्रेणीवाढ शासन अधिसूचना क्र.एएफओ-२०११/ प्र.क्र.६३/एफ-७, दि.१९.४.२०११ अन्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन) अशी करण्यात आलेली आहे. | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३३/फ-४, दि.१५.०३.२०१८ |
| ३ | अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) | १ | केंद्र शासनाकडील अधिसूचना क्र.१६०१६/२००२/AIS(II)/A, दि. १७.४.२००२, मुख्य वनसंरक्षक (संधारण) या पदाची श्रेणीवाढ शासन अधिसूचना क्र.आयएफएस-२०११/ प्र.क्र.१६५/एफ-७, दि.१६.६. २०११ अन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) अशी करण्यात आलेली आहे. | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३३/फ-४, दि.१५.०३.२०१८ |
| ४ | प्रशासकीय अधिकारी | १ | शा.नि.म.व.व.वि.क्र.एफडीएम ४५८३/९३०८९/फ-४ दि.१०.६.१९८३ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३३/फ-४, दि.१५.०३.२०१८ |

***************